**मराठवाडा,विदर्भ व उत्तर महाराष्ट्र जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाययोजनाचा विशेष कार्यक्रम सन २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी राबविण्यात येत असलेल्या बचतगट योजनेकरीता सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात उपलब्ध निधी वितरीत करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :-माविम-२०२३/प्र.क्र.१६९/का-९**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
दिनांक : २७ मार्च, २०२४.

**वाचा :-**

(१) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २०१८/प्र.क्र.८४/का-९ दि.७ ऑगस्ट,२०१९.
(२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र.अविवि २०१८/प्र.क्र.८४/का-९ दि.२४ नोव्हेबर,२०२२.
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. अर्थसं - २०२३/ प्र.क्र.४०/अर्थ-३, दि. १२ एप्रिल २०२३.
(४) व्यवस्थापकिय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.माविम/पीएमडी/२०२३-२४/२६८ दि.५.९.२०२३.

**प्रस्तावना :-**

मराठवाडा,विदर्भ व उत्तर महाराष्ट्राच्या जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाययोजना विशेष कार्यक्रम सन २०१८ या कार्यक्रमांतर्गत औरंगाबाद, अमरावती व नागपूर या महसूली विभागातील १४ जिल्हयांमध्ये महिला आर्थिक विकास महामंडामार्फत अल्पसंख्याक महिलाचे बचतगट निर्माण करुन त्यातील सदस्याना महाराष्ट्र राज्य कौशल्य सोसायटी मार्फत कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देणे, या योजनेस शासन निर्णय दि.७ ऑगस्ट,२०१९ अन्वये मान्यता देण्यात आली होती. सदर योजना ही २ वर्षाच्या कालावधीकरीता राबविण्याची तरतूद करण्यात आली होती. तथापि संदर्भ क्र.२ च्या दि.२४ नोव्हेबर,२०२२ च्या शासन निर्णयान्वये सदर योजना सुधारित स्वरुपात राबविण्याचा तसेच योजनेचा कालावधी सन २०२१-२२ ते २०२७-२८ असा ७ वर्ष वाढविण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे. सदर योजनेची अंमलबजावणी करण्याकरीता महिला आर्थिक विकास महामंडळाने संदर्भ क्र.४ च्या पत्रान्वये निधी मागणीचा प्रस्ताव सादर केला आहे. त्यास अनुसरुन सन २०२३-२४ या आर्थिक वर्षात अर्थसंकल्पित तरतूदीपैकी उपलब्ध तरतूदीमधून अनुदान वितरणाची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय** :- मराठवाडा,विदर्भ व उत्तर महाराष्ट्र जलद विकासासाठी राबवावयाच्या उपाययोजनाचा विशेष कार्यक्रम सन २०१८ या कार्यक्रमाअंतर्गत अल्पसंख्याक महिलांसाठी औरंगाबाद, अमरावती व नागपूर या महसूली विभागातील १५ जिल्हयामध्ये अंदाजे नवीन २८०० बचतगट निर्माण करणे व त्यातील सदस्याचे कौशल्य विकासाचे प्रशिक्षण देणे या योजनेकरीता सन २०२३-२४ या वर्षात लेखाशिर्ष (२२३५ सी ४०१) या लेखाशिर्षाअंतर्गत एकूण रु.३.१३ कोटी एवढा निधी अर्थसंकल्पित करण्यात आलेला आहे. त्यापैकी वित्त विभागाने उपलब्ध करून दिलेला २०% च्या प्रमाणात रु.६२,६०,०००/- (अक्षरी रुपये बासष्ठ लाख साठ हजार फक्त) एवढा निधी महिला आर्थिक विकास महामंडळास वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

२. सदर रक्कम ई कुबेर प्रणालीद्वारे महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई यांना अदा करण्यात यावी.

३. या रकमेचे उपयोगिता प्रमाणपत्र महिला आर्थिक विकास महामंडळाने शासनास सादर करणे आवश्यक राहिल. सदर निधीची रक्कम आहारित करण्यासाठी उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग हे नियंत्रक अधिकारी तथा अवर सचिव, अल्पसख्यांक विकास विभाग हे आहरण व संवितरण अधिकारी राहतील.

५. यासाठी होणारा खर्च सन २०२३-२४ या आर्थिक वर्षाकरीता मागणी क्र.झेडई-१, २२३५- सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाजकल्याण, १०३ महिला कल्याण (०१)(०१)(०१) मराठवाडा विदर्भ व उत्तर महाराष्ट्र याकरीता राबवावयाचा विशेष कार्यक्रम २०१८ अंतर्गत स्वयंसहायता बचतगटातील अल्पसंख्याक महिलांसाठी सहायक अनुदान (कार्यक्रम) ३१ सहायक अनुदान (वेतनेतर) (२२३५ सी ४०१) या लेखाशिर्षाखाली मंजूर असलेल्या अनुदानातून खर्ची टाकण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय वित्तीय अधिकारी नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला, वित्त विभाग, शासन निर्णय क्र. विअप्र २०१३/प्र क्र ३०/२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५ अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त झालेल्या अधिकारांतर्गत किंवा त्या त्या विभागास वेळोवेळी वित्तीय अधिकार नियम पुस्तिका भाग-२ अन्वये प्रदान करण्यास आलेल्या अधिकारानुसार तसेच शासन निर्णय, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२२/प्र.क्र.४०/ अर्थ-३, दि. १२ एप्रिल, २०२३ मधील सर्व अटींची व त्या सोबतच्या परिशिष्टांमधील मार्गदर्शन सूचनाची पुर्तता होत असून नियोजन विभागाच्या मान्यतेने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.८०/२०२४/व्यय-१ दि.२६.०२.२०२४ अन्वये प्राप्त मान्यतेस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharasthra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२४०३२७१७४०५८५८१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PRASHANT DADASAHEB ANDHARE

Digitally signed by PRASHANT DADASAHEB ANDHARE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=07a98306254b29e5139aab4819df96eb16b0b66a000c20ad72f67a4639fd58ca, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=7B06EE8A2C581E72F4DCE6564DC954B5C81A4E8EA299DAB1B3C26C0374583EB0, cn=PRASHANT DADASAHEB ANDHARE
Date: 2024.03.27 17:51:53 +05'30'

**( प्र. दा. अंधारे )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन,**

**प्रति,**

१. मा. राज्यपालांचे सचिव,
२.मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव,
३.मायांचे खाजगी सचिव (अवि) राज्यमंत्री/ मंत्री ., मंत्रालय, मुंबई,
४.महालेखापाल १/२ (लेखा परीक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर,
५.संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
६.अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
७.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
९.व्यवस्थापकीय संचालक, महिला आर्थिक विकास महामंडळ, मुंबई
१०.कक्ष अधिकारी (व्यय-१), वित्त विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
११.कक्ष अधिकारी (१४७५), नियोजन विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
१२.कक्ष अधिकारी (का-७,का-२ रोखशाखा) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय मुंबई-३२.
१३.निवडनस्ती ९ कार्यासन)) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई